**चारा टंचाई निवारणासाठी करावयाच्या**
**<u>उपाययोजना २००९-२०१०.</u>**
**शेतक-यांच्या शेतावर वैरण उत्पादनासाठी**
**५०% अनुदानावर वैरण बियाणे व खते**
**वाटप योजना.**

**महाराष्ट्र शासन**
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक- एफडीआर १००९/ प्र क्र ४४५ / पदुम ४
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :२९ ऑगस्ट, २००९.

**वाचा :** सामान्य प्रशासन विभागाचे पत्र दिनांक २६ ऑगस्ट, २००९ अन्वये दिनांक २१ ऑगस्ट २००९ रोजी पार पडलेल्या मंत्रीमंडळ बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

राज्यात साधारणपणे मोसमी पर्जन्यमानास जुन महिन्याच्या पहिल्या आठवड्यापासून सुरुवात होते. तथापी सन २००९ मध्ये आजतागायत राज्यातील २२१ तालुक्यामध्ये पावसाचे प्रमाण सरासरी पेक्षा अत्यल्प असल्याने सदर तालुक्यात टंचाई सदृष्य परिस्थिती जाहिर करण्यात आली आहे. टंचाई परिस्थितीवर मात करण्यासाठी शासनाच्या महसूल व वन विभागामार्फत विविध उपाययोजना करण्यात येत आहेत. दि. २१ ऑगस्ट, २००९ च्या मंत्रीमंडळ बैठकीत मिळालेल्या मान्यतेनुसार चारा टंचाईवर मात करण्यासाठी पशुसंवर्धन विभागामार्फत वैरण विकास ही योजना राबविण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे.

**शासन निर्णय** :

राज्यातील टंचाईग्रस्त तालुक्यातील गुरांना हिरवी वैरण उपलब्ध व्हावी व चारा टंचाई परिस्थितीवर मात करण्यासाठी खालीलप्रमाणे **शेतक-यांच्या शेतावर वैरण उत्पादनासाठी ५०% अनुदानावर वैरण बियाणे व खते वाटप योजना** राबविण्यास याद्वारे शासन मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

१ ज्या शेतक-यांकडे सिंचनाची सुविधा आहे त्यांना वैरणीचे बियाणे, खते व इतर अनुषंगीक बाबींचा पुरवठा ५० % अनुदानावर रु.३००/- प्रति शेतकरी प्रति एकर या मर्यादेपर्यन्त करण्यात यावा.

२ सदर वैरण विकास कार्यक्रम महसुल व वन विभागाने वेळोवेळी शासन निर्णयान्वये टंचाई परिस्थिती जाहीर करण्यात आलेल्या दुष्काळग्रस्त तालुक्यामध्येच राबविण्यात यावा.

३ या वैरण विकास योजने अंतर्गत लाभार्थी शेतक-यांची निवड करण्यासाठी व हा कार्यक्रम यशस्वीपणे राबविण्यासाठी खालीलप्रमाणे संबंधित जिल्ह्याकरीता जिल्हा स्तरीय समिती नियुक्त करण्यात येत आहे.

अ) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद -- अध्यक्ष
ब) कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद -- सदस्य
क) कार्यकारी अभियंता ( पाटबंधारे) -- सदस्य
ड) उप जिल्हाधिकारी ( जिल्हाधिकारी कार्यालय)-- सदस्य
इ ) जिल्हा पशुसंवर्धन उपसंचालक -- सदस्य
फ ) जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद -- सदस्य सचिव

सदर समिती संबंधित तालुक्याचे तहसिलदार, गट विकास अधिकारी व पशुधन विकास अधिकारी (विस्तार) यांचे समितीद्वारे प्राप्त प्रस्तावानुसार योजनेतील लाभार्थिच्या यादीस मंजूरी प्रदान करेल

४ उपरोक्त योजना रब्बी हंगामापुरती मर्यादीत असून पेरणी नंतर ७५ दिवसांनी हिरवी वैरण जनावरासाठी उपलब्ध होऊ शकेल शेतक-यांकडील पशुधनासाठी चा-याची गरज भागवून, शेतक-यांकडील उर्वरित चारा शासनाने निश्चत केलेल्या दरानुसार चारा डेपो/ गुरांच्या छावण्यासाठी उपलब्ध करुन घेण्यात यावा.

५ योजना यशस्वीपणे राबविण्यासाठी, वैरण उत्पादनासंदर्भात सविस्तर तांत्रीक मार्गदर्शक सुचना आयुक्त पशुसंवर्धन यांनी त्यांच्या स्तरावरुन क्षेत्रीय कार्यालयांना निर्गमित कराव्यात.

६ या योजनेअंतर्गत खरेदी करावयाचे वैरणीची बि- बीयाणे व इतर अनुषंगीक बाबींची खरेदी ही शासकीय विहित कार्यपध्दीचा अवलंब करुन करण्यात यावी.

७ सदर योजनेची अंमलबजावणी संबंधित जिल्हयाचे जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद हे करतील.

८ पाऊसामुळे चारा उपलब्धतेत बदल झला आहे का याचा वेळोवेळी आढावा घेऊनच सदर योजना राबविण्यात यावी.

९ सदर योजना राबविण्यासाठी निधी उपलब्धतेचा शासन निर्णय स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात

येईल.

प्रत्येक तालुक्यातुन या योजनेसाठी एकूण ५०० शेतक-यांची निवड करण्यात यावी. सिंचनेच्या सुविधेनुसार व उपलब्ध निधी विचारात घेऊन यामध्ये बदल करण्याचे अधिकारी जिल्हास्तरीय समितीस राहतील.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( डॉ. मा.ना.सवाईसोनकांबळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत माहिती व योग्य त्या कार्यवाहीस्तव -**

अपर मुख्य सचिव, मदत व पुर्नवसन ( महसुल व वन विभाग)
प्रधान सचिव ( नियोजन) नियोजन विभाग
प्रधान सचिव ( वित्त ) वित्त विभाग
प्रधान सचिव (कृषि ), कृषि व पदुम विभाग
आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य पुणे, (५ प्रती)
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व प्रादेशिक सह आयुक्त पशुसंवर्धन
सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त
सर्व जिल्हा कृषि अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व कार्यासन, कृषि व पदुम विभाग,
निवड नस्ती